श्री. पी. बी. केजकर (सेवानिवृत्त) यांना सहायक नियंत्रक पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन आदेश क्रमांक - वैमाशा-२०२२ /३/ प्र.क्र.०७/ ग्रासं-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २८ एप्रिल, २०२२

**संदर्भ** :- १) शासन निर्णय क्रमांक - वैमाशा-१२०६ / ५४४/ प्र.क्र.३३२६/ ग्रासं-३, दि. १२/३/२००८
२) नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांचे पत्र क्र. मनदि (५१) -१०२१ / प्र.क्र.१/ वैमाशा-४/२०२२ /०४, दिनांक - ४ जानेवारी, २०२२
३) शासन निर्णय क्र. वैमाशा-२०२० / प्र.क्र.६५/ग्रासं-३, दि. १४ जानेवारी, २०२१

**आदेश**

संदर्भ क्र. १ येथील दिनांक १२ मार्च, २००८ च्या शासन निर्णयान्वये श्री. पी. बी. केजकर, यांना निरीक्षक निवडश्रेणी या पदावरुन सहायक नियंत्रक या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्यात आली होती.

०२. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांनी मुळ अर्ज क्र. ८८/२००८ या प्रकरणामध्ये दि. २०.१०.२००८ रोजी सहायक नियंत्रक, वैध मापन शास्त्र या संवर्गात सन १९८४ ते दिनांक १७/४/१९९६ या कालावधीत दिलेल्या पदोन्नत्यांचे सरळसेवा व पदोन्नती यांचे प्रमाणे ५०:५० टक्के गृहित धरुन पुनर्विलोकन करण्याचे आदेश दिलेले आहेत. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाचे आदेश सन १९८४ ते १९९६ या कालावधीबाबत असले तरी त्याचा परिणाम पुढील सर्वच निवडसूच्यांवर होत असल्यामुळे सदर संवर्गात आतापर्यंत दिलेल्या सर्वच पदोन्नत्यांचे पुनर्विलोकन करणे क्रमप्राप्त ठरले. त्याअनुषंगाने वैध मापन शास्त्र यंत्रणेतील सन १९८४ ते २००८ या कालावधीत दिलेल्या सर्वच पदोन्नत्यांचे पुनर्विलोकन करण्यात आले असून सुधारित निवडसूच्यांना सामान्य प्रशासन विभागाची तसेच शासनाची मान्यता घेण्यात आलेली आहे.

०३. वरीलप्रमाणे पुनर्विलोकन केलेल्या निवडसूच्यांच्या आधारे श्री. केजकर यांना सन २००१-२००२ या निवडसूची वर्षामध्ये पदोन्नती देय होत असून त्यांना **दि.०६/०४/२००२ हा सहाय्यक नियंत्रक पदावरील नियमित पदोन्नतीचा दिनांक देण्यात येत आहे.**

०४. दिनांक १४ जानेवारी, २०२१ च्या शासन निर्णयान्वये निरीक्षक निवडश्रेणी या पदाचे पदनाम सहायक नियंत्रक व सहायक नियंत्रक या पदाचे पदनाम उप नियंत्रक असे करण्यात आलेले आहे. त्यानूसार श्री. पी. बी. केजकर यांचे सध्याचे पदनाम उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र हे आहे.

०५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०४२८१६१५५८६००६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHITAL ANAND RAMTEKE

Digitally signed by SHITAL ANAND RAMTEKE
DN: CN = SHITAL ANAND RAMTEKE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT
Date: 2022.04.28 16:17:52 +05'30'

**( शितल रामटेके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१) श्री. पी. बी. केजकर (सेवानिवृत्त) उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र,
(नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांचे मार्फत)

**प्रति,**

१) नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२) सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, औरंगाबाद विभागीय कार्यालय, औरंगाबाद.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
४) निवडनस्ती (ग्रासं-३)